महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत
प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या पाणी
पुरवठा व मलनि:स्सारण योजनांना अनुदान
वितरीत करण्याबाबत.
कामठी नगर परिषद, जि. नागपूर

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सुनिअ- २०१५/प्र.क्र.७३/पापु.२२

गो.ते. हॉस्पिटल संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: १२ मे, २०१७

**वाचा :**

१. **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ २००८/प्र.क्र.१/पापु-२२,दि. २२.१०.२००८**
२. **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.सुनिअ २००८/प्र.क्र.१९८/पापु-२२, दि.२३.१२. २००८**
३. **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ २०१३/प्र.क्र.२२८/पापु-२२, दि. ९.५.२०१३**
४. **मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांचे पत्र क्र.मु.अ./प्र.व्य.स.से./पुणे/तांशा-२/१०१७/२०१४, दि.११.७.२०१४**
५. **शासन निर्णय, समक्रमांक, दि.३०.३.२०१५**
६. **मुख्य अधिकारी, नगर परिषद कामठी यांचे पत्र क्र. नपका/जलवि./९३६/२०१७, दि. ०१/०३/२०१७.**

**प्रस्तावना :**

शासन निर्णय, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ अन्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे हा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दिनांक ९.५.२०१३ अन्वये कामठी शहर पाणी पुरवठा योजनेच्या एकूण रु. १,१८,६५,०००/- इतक्या ढोबळ किंमतीच्या सुधारणा कामास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांनी संदर्भ क्र.४ अन्वये सदर योजनेतील सुधारणा कामांच्या एकूण रु. ९३,००,१११/- इतक्या निव्वळ किंमतीस तांत्रिक मान्यता दिली आहे. सदर रक्कमेवर शासन निर्णय, दि. ९.५.२०१३ प्रमाणे मंजूर ७% ई.टी.पी.चार्जेस रु.६,५१,००७/- मिळवून योजनेची सुधारीत किंमत रु.९९.५१ लक्ष येत असुन, त्याप्रमाणे सदर योजनेस रु.८९.५६ लक्ष अनुदान अनुज्ञेय आहे. कामठी नगर

परिषदेने स्वहिश्श्यापोटीची संपुर्ण रक्कम रु.९.९५ लक्ष बँक खात्यामध्ये जमा केली असुन त्यानुषंगाने शासन निर्णय दि.३०.३.२०१५ अन्वये सदर योजनेस अनुज्ञेय अनुदानापैकी रु.४४.७८ लक्ष अनुदान कामठी नगर परिषदेस वितरीत करण्यात आले आहे. मुख्याधिकारी, कामठी नगर परिषद यांनी एकूण रु.४२.८१ लक्ष रकमेचे विनियोग प्रमाणपत्र सादर केले आहे. तसेच, मंजूर सुधारणा कामे ९०% पुर्ण झाली असल्याबाबतचा प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार यांनी प्रमाणित केलेला भौतिक प्रगती अहवाल सादर केला असुन उर्वरित अनुदान वितरीत करण्याची विनंती केली आहे. सदर बाबी विचारात घेता, कामठी शहर पाणी पुरवठा योजनेस अनुज्ञेय अनुदानापैकी उर्वरित अनुदान रु.४४.७८ लक्ष कामठी नगर परिषदेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दि. ९.५.२०१३ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या कामठी शहर पाणी पुरवठा योजनेतील सुधारणा कामांकरीता अनुज्ञेय असलेल्या अनुदानापैकी उर्वरित अनुदान रुपये ४४,७८,०००/- (रुपये चव्वेचाळीस लाख अठ्ठयाहत्तर हजार फक्त) इतके अनुदान पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम लाखांत)

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेने निकषानुसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | या अगोदर शासनाकडून वितरीत करण्यात आलेले अनुदान | राज्य शासना-कडून आता वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| कामठी, जि. नागपूर | ९९.५१ | ८९.५६ | ९.९५ | ९.९५ | ४४.७८ | **४४.७८** |
| | | | | | **एकुण रुपये** | ४४.७८ |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगर पालिका इत्यादींना सहाय्य - राज्य योजना - (०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहायक अनुदान (२२१५ १६४७), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर लेखाशिर्षाखाली शासनाकडून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमूद स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगीता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावी.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधीत नागरी संस्थानी शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक- नापापु २००८/प्र.क्र.१/पापु-२२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१२१४५२०१८६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prabhakar Laxman Chakre

Digitally signed by Prabhakar Laxman Chakre
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fb55c284fefe73988e693f9b35dc7d7550dd83ea4655d9b78cccfa4d9d2f67eb, cn=Prabhakar Laxman Chakre
Date: 2017.05.15 12:14:13 +05'30'

**(प्र.ल.चक्रे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

- मा.मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
- सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
- महालेखापाल¬२, नागपूर
- संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.
- विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
- जिल्हाधिकारी, नागपूर
- संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- अध्यक्ष/मुख्याधिकारी, कामठी नगरपरिषद, जि. नागपूर
- जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
- जिल्हा प्रकल्प अधिकारी, (नगरपालिका) जिल्हाधिकारी कार्यालय, नागपूर
- वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- कक्ष अधिकारी, पापु.०४,पापु.२०,पापु.२१, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- निवडनस्ती, पापु-२२.